राज्यातील शहरी व ग्रामीण भागातील शिधापत्रिकाधारकांच्या केरोसिन वितरणाचे परिमाण एकरुप करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः रॉकेल-२०१४/प्र.क्र.१७१/ना.पु.२७
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
दिनांक : २० ऑगस्ट, २०१५

वाचा -

१) शासन पत्र अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक : केईआर-१०९७/प्र.क्र.५३४०/ना.पु.-२७, दिनांक २८ मे, १९९७
२) शासन पत्र अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक : केईआर-१०९७/प्र.क्र.५३४०/ना.पु.-२७, दिनांक ११ जुलै, १९९७
३) शासन पत्र अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक : केईआर-१०९७/२७०६/प्र.क्र.५४०९/ना.पु.-२७, दिनांक २८ जुलै, १९९७
४) शासन पत्र अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक : केईआर-१०९७/२७८६/प्र.क्र.५४०९/ना.पु.-२७, दिनांक २७ जुलै, १९९८
५) शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक : रॉकेल-१०००/प्र.क्र.७९७/ना.पु.-२७, दिनांक ३१ मार्च, २००१
६) शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक : रॉकेल-१०००/प्र.क्र.७९७/ना.पु.-२७, दिनांक ८ जून, २००१
७) मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांचे जनहित याचिका क्र.१६/२०१४ मधील दि.१ जुलै, २०१५ चे अंतरिम आदेश.

## शासन निर्णय -

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत ग्रामीण व शहरी भागाकरिता केरोसिन वितरण परिमाण राज्य शासनाने जून, १९९७ पासून निश्चित केले आहे. सदर परिमाणामुळे, ग्रामीण भागातील शिधापत्रिकाधारकांवर अन्याय होत असल्याने, ग्रामीण व शहरी भागाकरिता समान परिमाण ठरवावे, अशा आशयाची रिट याचिका क्र.३६७१/१९९८ आदर्श बाल विकास महिला मंडळ, नागपूर या संस्थेने मा.उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठासमोर सादर केली होती. या याचिकेसंदर्भात मा.उच्च न्यायालयाने दि.२९.६.२००० रोजी “गरीब जनतेची केरोसिनची गरज जास्त असते व गरीब जनता मुख्यत्वे ग्रामीण भागात राहत असल्याने, शासनाने ग्रामीण व शहरी भागाकरिता केरोसिनचे समान परिमाण ठरविण्याबाबत पुनर्विचार करावा” असे आदेश दिले.

२. मा.उच्च न्यायालयाचे आदेश विचारात घेऊन शासन निर्णय दि. ३१ मार्च, २००१ अन्वये ग्रामीण व शहरी भागाकरिता केरोसिनचे समान परिमाण निश्चित करुन सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी दि.१ मे, २००१ पासून करण्यात आली. सदर शासन निर्णयामुळे शहरी भागातील मुख्यत्वे मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्रातील बिगर गॅसधारक शिधापत्रिकाधारकांच्या परिमाणात कपात झाल्यामुळे या क्षेत्रात

मे, २००१ पूर्वीचेच परिमाण लागू करावे, अशा स्वरुपाची निवेदने अनेक लोकप्रतिनिधींकडून शासनास प्राप्त झाली. त्यामुळे ग्रामीण व शहरी भागाकरिता निश्चित केलेले केरोसिनचे समान परिमाण रद्द करुन माहे मे, २००१ पूर्वी असलेले परिमाण लागू करण्याचा निर्णय शासन निर्णय दि.८ जून, २००१ अन्वये घेण्यात आला.

३. शासनाने सध्या विहित केलेल्या केरोसिन परिमाणानुसार केरोसिन मिळत नसल्यामुळे मा.उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे श्री. कडूजी देवबा पुंड यांनी जनहित याचिका क्र.१६/२०१४ दाखल केलेली आहे. रिट याचिका क्र.३६७१/१९९८ मध्ये दि.२९ जून, २००० रोजी मा.उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ यांनी दिलेल्या निर्णयाप्रमाणे केरोसिन वाटपाबाबतचे शासनाने ठरविलेले धोरण सुधारित करावे, असे आदेश मा.उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ यांनी जनहित याचिका क्र.१६/२०१४ मध्ये दि.१८ जून, २०१४ रोजी दिले आहेत. तसेच या प्रकरणी मा.उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ यांचे दि.१.७.२०१५ रोजी दिलेले आदेश खालीलप्रमाणे आहेत:-

"अ) In order to enable the State Government to re-examine the issue as to whether the policy needs reconsideration or not , we grants six weeks time.

ब) However, by an interim order, we direct that until further order are passed by this Court , the State Government shall immediately provide equal quota for the residents of urban areas and rural areas."

मा.उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ यांनी दिलेल्या उपरोक्त आदेशानुसार केरोसिन वितरणाबाबतच्या परिमाणाचे सुधारित धोरण ठरविणे आवश्यक झाले आहे.

४. मा.उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ यांचे दि.१ जुलै, २०१५ रोजीचे आदेश विचारात घेता सध्याच्या केरोसिन वितरणाच्या परिमाणामध्ये बदल करुन आता पुढीलप्रमाणे केरोसिन वितरणाचे सुधारित परिमाण निश्चित करण्यात येत आहे.

अ) शहरी व ग्रामीण भागासाठी वेगवेगळे असलेले केरोसिन वाटपाचे परिमाण रद्द करून आता शहरी व ग्रामीण भागातील बिगर गॅस शिधापत्रिकाधारकांसाठी पुढीलप्रमाणे एकरुप परिमाण निश्चित करण्यात येत आहे.सदर परिमाण राज्यास केंद्र शासनाकडून उपलब्ध होणाऱ्या केरोसिन नियतनाच्या अधीन राहील.

| अ.क्र. | शिधापत्रिकेवरील व्यक्तींची संख्या | अनुज्ञेय केरोसिन कोटा( लिटर) |
|---|---|---|
| १ | १ व्यक्ती | २ लिटर |
| २ | २ व्यक्ती | ३ लिटर |
| ३ | ३ व्यक्ती वा त्याहून अधिक व्यक्ती | ४ लिटर |

ब) राज्यातील दोन गॅस जोडणी शिधापत्रिकाधारकास वार्षिक १२ गॅस सिलेंडर सवलतीच्या दराने अनुज्ञेय असल्यामुळे त्यांना केरोसिन अनुज्ञेय नाही. तसेच एक गॅस जोडणी शिधापत्रिकाधारकासही वार्षिक १२ गॅस सिलेंडर अनुज्ञये असल्यामुळे त्यांनाही यापुढे शिधापत्रिकेवर केरोसिन अनुज्ञेय राहणार नाही.

५. संदर्भाधीन नमूद केलेले अ.क्र. १ ते ६ येथील शासन आदेश / पत्रांमधील केरोसिन वाटपाबाबतच्या परिमाणाबाबतच्या सूचना / निदेश याद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहेत.

६. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०८२०१६३२१५५८०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Govind Thosar

Digitally signed by Kishor Govind Thosar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kishor Govind Thosar
Date: 2015.08.20 16:37:28 +05'30'

( कि.गो.ठोसर )
अवर सचिव
अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग

**प्रत,**

१.सर्व विभागीय आयुक्त
२.सर्व जिल्हाधिकारी
३. नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई
४. संचालक, नागरी पुरवठा (पुरवठा आयुक्त कार्यालय), मुंबई
५. सर्व उप आयुक्त (पुरवठा)
६.सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
७.सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
८. सर्व तहसीलदार
९. राज्यस्तरीय समन्वयक तेल उद्योग,मुंबई.
१०.महाव्यवस्थापक, भारत पेट्रोलियम कॉर्पोरेशन लि./हिंदुस्थान पेट्रोलियम कॉर्पोरेशन लि./इंडियन ऑईल कॉर्पोरेशन लि.
११.मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
१२. मा.मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
१३. मा.राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
१४. निवडनस्ती (ना.पु.-२७)